कृण्वन्तो विश्वमार्यम्।
''समस्त विश्वाला श्रेष्ठ बनविले पाहिजे''

## महर्षि स्वामी दयानन्द सरस्वती

महाभारताच्या युद्धानंतर भारतात विशुद्ध धार्मिक पद्धत नष्ट होत चालली त्या जागी वेगवेगळे मत-सम्प्रदाय निर्माण होत गेले आणि अज्ञाना मुळे वेगवेगळ्या चुकीच्या धारणांचा जन्म होत चालला आणि अनेकानेक स्वार्थी पीर पैगम्बर धर्मगुरु आणि महात्माने आपली स्वार्थ सिद्धि साठी पारसी, यहूदी, ईसाई, इस्लाम, बौद्ध, जैन, चार्वाक इत्यादि सम्प्रदायची स्थापना केली पण या गोष्टी शंभर टक्के सत्य आहे की या सर्व लोकांचे पूर्वज त्यांचे वर्तमान स्वरूपाच्यापूर्वी त्यांचे निकटचे संबंध वैदिक धर्मावलम्बीशी होतेच. अंधविश्वास आणि अज्ञानात

अडकल्यामुळे संसारात असलेल्या विभिन्न मत-मतान्तराच्या अनुयायी वैदिक धर्माशी कोणत्या न कोणत्या कारणा वरून दूरावत गेले तथापि त्याचे वर्तमान स्वरूप बनले. महर्षि स्वामी दयानन्द सरस्वतीना ही स्थिति सहन झाली नाही व त्यांनी आपले प्रयत्न त्या परिस्थितिच्या नायनाट करण्यासाठी प्रारंभ केले. त्यांच्या विचारांनी प्रभावित होऊन अनेक श्रेष्ठ व्यक्तिनी महर्षि स्वामी दयानन्द सरस्वती ना सल्ला दिला की तुमच्या विचारांना जन मानसा पर्यंत पोहचविण्यासाठी अशी संस्था स्थापन केली पाहिजे ज्याने तुमच्या विचारांचा प्रसार प्रचार अधिक प्रबल होऊ शकेल. तथापि ई. स. १८७५ ला 'आर्य समाज मुंबई' या नावाची संस्था मुंबई नगरात स्थापन झाली आणि बघता बघता आर्य समाजचा विस्तार विश्वात पसरला.

आर्य समाज म्हणजे काही सम्प्रदाय, मत किंवा पंथ नाही, ते एक असे संगठन अथवा समुदाय आहे ज्याचे सुनिर्धारित नियम आहेत आणि ते फक्त मानवाच्या कल्याणासाठी कार्यरत आहे. आर्य समाजच्या स्थापनेचा एकमेव उद्देश्य म्हणजे सत्य सनातन वैदिक धर्माची नविन्यांनी स्थापना करणे व वेदांच्यानुसार सम्पूर्ण विश्वच्या उपकारासाठी अर्थात् शारीरिक, आत्मिक आणि सामाजिक प्रगतीसाठी प्रयत्न करणे प्रत्येक माणूस जसी आपल्या शारीरिक व आत्मिक प्रगतिसाठी प्रयत्न करतो तसीच सामूहिक प्रगतिसाठी प्रयत्न करावा, आर्य समाजच्या नवव्या नियमात याच विचाराला स्पष्ट स्वरूपात सांगीतले आहे, ''**प्रत्येकाने फक्त आपल्या प्रगतित समाधान न मानता सर्वांच्या प्रगतित आपली प्रगति आहे असे समजले पाहिजे.**'' मानव कल्याणाचे व्यक्तिगत अथवा सामूहिक हित, कल्याणाचे महत्वपूर्ण कार्य अशा लोकांद्वारे केले जाते जे सत्य, विद्या इत्यादि गुणांनी युक्त, धार्मिक व परोपकारी आहेत हे सर्व गुण ज्या लोकांमध्ये आहेत अशानाच 'आर्य' म्हणतात. असे लोक जेव्हां एकत्र येतात अर्थात् त्या संगठनाला 'आर्य समाज' संबोधिले जाते. आर्य हे कुणी जाति अथवा देश विशेषच्या नागरिकांचे नाव नाही.

## ■ सत्य सनातन वैदिक धर्माचे वैशिष्ट्ये संक्षिप्तात

बहुतेक भारतवासीयांचा वैदिक धर्म सनातन काळा पासून चालत असलेला प्राचीनतमधर्म आहे. त्याचे आधार परमेश्वराचे प्रदान केलेले चार वेद ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद आहे. वेदा मध्ये मानवच्या कल्याणासाठी सर्व उपयोगी ज्ञान सूत्र रूपात विद्यमान आहेत. वेदाचे गूढार्थचे विवेचन अथवा स्पष्टीकरण

ऋषिमुनीनी चार ब्राह्मण ग्रंथ, चार उपवेद, सहा दर्शनशास्त्र, सहा वेदांग, अकरा उपनिषद आदि ग्रथांची रचना मानवाला वैदिक ज्ञान सुलभ व सहज करण्यासाठी केली.

१) वैदिक धर्म संसाराच्या सर्व मत-मतान्तरां पेक्षा प्राचीन आहे. याची निर्मिति निर्सगाच्या प्रारंभापासून झाली आहे म्हणजे १,९७,२९,४९,०९४ वर्षा पासून.

२) संसारात जेवढे मत-मतान्तर आहेत ते सर्व कुणी पीर, पैगम्बर, मसीहा, गुरु, महात्मा इत्यादि द्वारा चालवत गेले आहे. पण वैदिक धर्म हा परमेश्वरानी चालवला आहे. या धर्माला कोणत्याही व्यक्तिने चालविले नाही.

३) वैदिक धर्म एक निराकार, सर्वज्ञ, सर्व व्यापक, न्यायकारी परमेश्वराला पूज्य मानतो. त्याची उपासना करणे योग्य आहे-इतर कोणत्याही देवी-देवत्याची उपासना करणे अयोग्य आहे.

४) परमेश्वर कधीही अवतार घेत नाही अथवा या भूमिवर शरीर धारण करून येत नाही.

५) आत्मा आणि ईश्वर (ब्रह्म) एक नाही ते दोन्ही वेग वेगळे आहेत. या दोघांपेक्षा वेगळी तिसरी शक्ति प्रकृति आहे. या तिन्ही अनादि आहेत.

६) वैदिक धर्मांचे सर्व सिद्धान्त सृष्टि क्रमाच्या नियमाच्या अनुकूल आहे व वैज्ञानिक आहेत. पण दुसऱ्या मत-मतान्तराचे चांगल्या पेक्षा चांगले नियम वैज्ञानिक परिक्षेवर खरे उतरत नाही.

७) करबला, मक्का, मदीना, यरुशलम, वेटीकन सीटी, हरिद्वार, काशी, मथुरा इत्यादि तीर्थ नसून तीर्थ क्षेत्र तर विद्याअभ्यास करणे, यम-नियमांचा पालन करणे, योगाचा अभ्यास करणे, आई-वडिलांची सेवा करणे तसेच सत्संग करणे, ज्यांनी माणसं दु:ख मुक्त होतात.

८) भूत, प्रेत, पिशाच्च इत्यादिनां वैदिक धर्मांत अंगीकार केले जात नाही. ही सगळी बाब काल्पनिक आहे आणि अडाणी लोकांचे अज्ञान आहे.

९) स्वर्ग आणि नरक काही विशेष स्थान नाही. सुखाचे स्थान स्वर्ग आणि दु:खाचे स्थान नरक आहे.

१०) स्वर्गाचे काही वेगळे दैवत नसतात. आई-वडील, गुरु, विद्वान् आणि पृथ्वी, जल, अग्नि, वायु इत्यादि स्वर्गाचे दैवत आहेत.

११) राम, कृष्ण, शिव, ब्रह्मा, विष्णु इत्यादि महापुरुष होऊन गेले; ते ईश्वर तर नव्हतेच शिवाय ते त्यांचे अवतार पण नव्हते.

१२) मनुष्य जसा शुभ अथवा अशुभ काम करतो त्यानुसार त्याला सुख अथवा दु:ख रूपी फळ मिळते. ईश्वर कोणत्याही परिस्थितीत मनुष्याच्या पापाला क्षमा करीत नाही.

१३) प्रत्येक मनुष्याला वेद वाचण्याचा अधिकार आहे मग शूद्र असो अथवा नारी.

१४) कर्माच्या आधारे समाजाला चार भागां मध्ये विभक्त केले आहे ज्याला आपण चार वर्ण म्हणतो जसे(१) ब्राह्मण(२) क्षत्रिय (३) वैश्य (४) शूद्र.

१५) जन्म घेताना सगळीच माणस शूद्र असतात पण आपल्या आपल्या गुणकर्माच्या व स्वभाव अर्जित संस्काराद्वारे ब्राह्मण, क्षत्रिय,वैश्य आणि शूद्र होतात, भले त्याच्या जन्म कोणत्याही घराण्यात झाला असेल.

१६) सफाई कामगार, चांभार इतर कोणीही मनुष्य त्या जातित जन्म घेतल्याने अस्पृश्य होत नाही, जो घाणेरडा काम करतो आणि आचरण करतो तो अस्पृश्य आहे मग तो भले ब्राह्मण असो अथवा शूद्र अथवा कोणी इतर.

१७) वैदिक धर्म पुर्नजन्म मानतो, जो माणूस अधिक चांगले काम करतो तो पुन्हा मनुष्य जन्मात येतो. आणि जो माणूस वाईट कामे करतो तो पशु, पक्षी, किटक, आदि रूपात जन्म घेतो.

१८) गंगा-यमुना व इतर नद्यात आंघोळ केल्यामुळे पापा पासून मुक्ति मिळत नाही तर वेदानुसार उत्तम कार्य केल्याने मनुष्य भविष्यात पाप करण्यापासून वाचू शकतो पण केलेल्या पापा पासून तो वाचू शकत नाही.

१९) प्रत्येक वैदिक धर्मीसाठी पाच महायज्ञ करणे आवश्यक आहेत. १) ब्रह्मयज्ञ (ईश्वराची उपासना करणे) (२) देवयज्ञ (हवन करणे) (३) पितृ यज्ञ (आई-वडील, सासु-सासरे यांची सेवा करणे) (४) बलि वैश्वदेव यज्ञ (गाय, कुत्रा,

चिमणी, मुंगी आणि विधवा, अनाथ, अंपग इत्यादिना भोजन देणे) (५)अतिथि यज्ञ (विद्वान्, सन्यासी, उपदेशक इत्यादि चा उपदेश ऐकून त्यांची सेवा आणि त्यांचा सत्कार करणे).

२०) जीवित असलेल्या आई-वडील, गुरु, विद्वान् इत्यादिची सेवा करणे म्हणजेच श्राद्ध बोलले जाते. मृत झालेल्या पितराच्या नावावर ब्राह्मणांना दिलेले भोजन, वस्त्र, धन त्यांच्या पर्यंत पोहचत नाही.

२१) मनुष्याचे मन आणि आत्मा जर उत्तम बनवायचे असेल तर जातकर्म, नामकरण, यज्ञोपवीत इत्यादि सारखे सोळा संस्कार करणे प्रत्येक मनुष्यचे कर्तव्य आहे.

२२) मूर्ति-पूजा, स्पृश्य-अस्पृश्य, जात-पात, जादु-मंत्र, ताबीज, शकुन, जन्म पत्रिका, ज्योतिष-फळ, हस्त रेषा, नवग्रह पूजा,बलिप्रथा, सती-प्रथा, मांसाहार, मद्यपान, बहुविवाह, बालविवाह इत्यादि विषयाचा वैदिक धर्मात निषेध आहे.

२३) जेव्हां मनुष्य वेदानुसार सत्य ज्ञान प्राप्त करून निष्काम भावाने शुभ कार्य करतो तसेच शुद्ध उपासना पद्धतिने ईश्वराबरोबर संबंध स्थापित करतो तेव्हां त्याची अविद्या (रागद्वेष इत्यादि वासना) समाप्त होऊन जीवाची मुक्ति होते. मुक्त अवस्थेत जीव अनन्त कालापर्यंत तिन्ही प्रकाराच्या दुःखापासून दूर राहून तो आनन्द रसाचा भोग करतो आणि त्यानंतर त्याला वाटेल तेव्हां तो मनुष्य जन्म घेतो.

२४) वैदिक धर्मी लोक आपसांत भेटीच्या वेळी 'नमस्ते' बोलून एक-दूसऱ्याचे अभिवादन करतात.

२५) वेदा मध्ये परमेश्वराचा वेग-वेगळ्या नावाने उल्लेख केलेला आहे. त्यामध्ये 'प्रणव' = ओ३म् प्रमुख नाव आहे.

**विशेष :-** वर लिहिलेल्या सिद्धान्ताबद्दल विशेष माहिती मिळवायची असेल तर महर्षि स्वामी दयानन्द सरस्वतीचा लिहिलेला सत्यार्थ-प्रकाश, ऋग्वेदादि भाष्य भूमिका, संस्कार विधि इत्यादि ग्रंथाचा स्वाध्याय करावा. हे ग्रंथ प्रत्येक आर्य समाजात उपलब्ध आहेत.

आर्य समाज मंदिर बम्बई का भव्य प्रवेश द्वार

आर्य समाज बम्बईकी मुलुण्ड शाखाका भव्य नवीन भवन